# सौष्ठव



संपादक
श्रीधर तिळवे

21मार्च-6एप्रिल 1999
सौष्ठव अंक पाचवा

# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे

सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड

## १९५० नंतरचा साहित्यव्यवहार

अभिजित देशपांडे

### साहित्यव्यवहार म्हणजे काय?

पूर्वी लेखक - साहित्यकृती - वाचक आणि ती साहित्यकृती वाचकापर्यंत पोहोचविणारं मौखिक किंवा छापील माध्यम अशी साधी सरळ साखळी होती. आज ती तशी साधी सरळपणे गृहीत धरता येणार नाही.

कोणताही कलाव्यवहार हा विशिष्ट सामाजिक - सांस्कृतिक परिसरात आणि त्या अंतर्गत असलेल्या व्यवस्थेतच घडत असतो. समाज - संस्कृतीतील व्यवस्थांची ही जाळी ज्या प्रमाणात एकमेकांत गुंतली - गुंफली जातात; त्या प्रमाणात कलाव्यवहाराचेही स्वरुप गुंतागुंतीचे, साधनं आणि व्यवस्थेवर आधारलेले असे होते. त्यामुळे साहित्यव्यवहाराचा विचार निव्वळ लेखक-साहित्यकृती आणि वाचकाच्या त्रिकोणात पूर्ण होत नाही. तर नव्याने अस्तित्वात आलेली इतरही अनेक साधनं आणि व्यवस्था या व्यवहारांत प्रत्यक्ष - अप्रत्यक्ष सहभागी होत असतात. त्यामुळे 'साहित्यव्यवहार' या संज्ञेचा परिसर असा कितीतरी व्यापक होतो.

यांत - लेखक, वाचक, प्रकाशक, समीक्षक, ग्रंथव्यवहार, वाङ्मयीन वा अर्धवाङ्मयीन नियतकालिकं, दैनिकांच्या रविवारीय पुरवण्या, दिवाळी अंक, वाङ्मयीन संस्था वा चळवळी, प्रकल्प, शासकीय सहभागाने किंवा पाठिंब्याने राबविण्यात येणारे वाङ्मयीन उपक्रम, सभा-संमेलने - ग्रंथप्रदर्शने - मेळावे, जाहिराती, पारितोषिकं - अनुदान, विद्यापीठं, ... आणि सर्वांच्या तळाशी असलेली सामाजिक - सांस्कृतिक प्रक्रिया या सर्वांचाच समावेश होतो.

साहित्यव्यवहार या संकल्पनेची व्याख्याच करायची झाली तर ती अशी करता येईल.

साहित्याच्या स्वभावाला आणि प्रभावाला
निश्चित, नियमित आणि नियंत्रीत करणाऱ्या
ज्या ज्या म्हणून घटना, प्रक्रिया किंवा व्यवहार
असतील, ते ते सर्व म्हणजे साहित्यव्यवहार.

विषय खूप व्यापक आहे. माझ्या मर्यादेत मी काही नोंदी घेण्याचा प्रयत्न करणार आहे.

### विषयसूत्र

१९४७ साली भारत स्वतंत्र झाला. समाजजीवनाचं प्रत्येक क्षेत्र स्वातंत्र्याच्या नव्या गर्तेत फेकलं गेलं. प्रत्येक क्षेत्रावर स्वत:च्या स्वातंत्र्याची नव्याने उभारणी करण्याची जबाबदारी येऊन पडली. नव्याने प्राप्त झालेल्या या राजकीय आणि सामाजिक स्वातंत्र्याच्या जाणीवेला अर्थ द्यायचा होता.

१९५० च्या सुमारास, नेहरुयुग अवतरल्यानंतर, औद्योगिकीकरणाच्या प्रक्रियेने वेग घेतला आणि त्यातून शहरी आणि ग्रामीण (शरद जोशींच्या भाषेत, India आणि भारत) अशा दोन स्वतंत्र वास्तवांची उभारणी झाली. त्यातून विविध सामाजिक स्तरही उदयाला आले आणि परिणामी विविध प्रकारची विषमताही जन्माला आली.

साक्षर आणि निरक्षर, नोकरदार आणि बेकार, मध्यमवर्ग आणि इतर, वयस्क आणि युवापिढी असे भेद कधी नव्हे इतके ठळक झाले. गांधीच्या हत्येनंतर ब्राह्मणवर्गावर प्रकट झालेला रोष आणि बाबासाहेबांच्या नेतृत्वाखालील धम्मचक्रप्रवर्तनानंतर दलितांच्या अस्मितेची नव्याने झालेली जडणघडण यातून जातीय भेदरेषांना नवीन निमित्त मिळाले. नेहरुयुगाने अल्पावधीतच सगळ्या पातळ्यांवर भ्रमनिरास घडविला. संयुक्त महाराष्ट्रासाठी उभारावी लागलेली चळवळ म्हणजेही देशांतर्गत प्रांतीय राजकारणाची नांदीच होती.

सगळ्या क्षेत्रांतील घटनांना नव्यानेच राजकीय परिमाण आणि

मूल्य प्राप्त झाले. सगळी समाजव्यवस्थाच एका प्रचंड स्थित्यंतरातून जात होती. आणि या सर्व घडामोडींतून राजकीय, जातीय आणि स्वार्थी व्यक्तीवादी प्रवृत्तीचा पाया घातला गेला.

या अर्धशतकातील वाङ्मयव्यवहाराची पार्श्वभूमी आहे ती अशी.

**नवील लेखन - अस्मितांचे उदय :-**

स्वातंत्र्य मिळाल्यावर विविध सामाजिक स्तरांवर अस्मितांची नव्याने उभारणी होऊ लागली. नवनवीन अस्मितांचे हुंकार आणि आविष्कार साहित्यातूनही प्रकटायला लागले.

या अर्धशतकाच्या पहिल्या दशकातच ग्रामीण, दलित, आदिवासी, स्त्रीवादी, देशीवादी ... अशा विविध साहित्यप्रवाहांचा पाया घातला गेला.

यातील फार मोठा लेखकवर्ग उदयाला आला होता तो बहुजनसमाजातून. म्हणजे ग्रामीण, दलित, आदिवासी - अशा विविध सामाजिक स्तरांतून या वर्गाला मिळालेली शिक्षणाची संधी, राजकीय व सामाजिक स्वातंत्र यातून आपल्या स्वतंत्र्य अनुभव विश्वावर, आपल्या जीवनावर लिहीण्याची त्याला प्रेरणा मिळाली. म्हणजे या वर्गाची नव्याने सामाजिक आणि साहित्यिक जडणघडण झाली. प्रामुख्याने हा सामाजिक पातळीवरचा आविष्कार होता. समाजातील परंपरागत नि सांकेतिक मूल्यव्यवस्थेच्या नकारातून नव - अस्मितेची ती उभारणी होती. त्यामुळे या साहित्याचे सौंदर्यशास्त्रही थेट या वर्गाच्या सामाजिक भूमिकेतून अवतरले होते. याचवेळेस आणखी एक लेखकाचा वर्ग अस्तित्वात आला. ज्याचे बंड वाङ्मयीन पातळीवरचे होते. प्रस्थापित वाङ्मयीन संकेत आणि साचेबंदपणाला नकारातून लघुअनियतकालिकांची चळवळ जन्माला आली. यांतील बरेचसे लेखन हे निव्वळ प्रतिक्रियावादी व तात्कालिक स्वरुपाचे होते. लांब पल्ल्याचे लेखक तेवढे पुढे टिकले. नेमाडे-शहाणे-राजा ढाले यांनी या चळवळीची तात्त्विक उभारणी केली. गद्यशैली आणि कवितांच्या बाबतीत या पिढीने मूलभूत महत्वाचे कार्य केले. १९७० च्या आसपास ही चळवळ विखुरली.

या काळातील फार मोठा लेखक वर्ग पाश्चात्य लेखनप्रवाहांशी आणि जाणिवांशी परिचित झाल्याने सांकल्पनिक पातळीवरचे एक नवीनच विश्व त्याला खुले झाले होते. आणि त्याचवेळेस त्याला तत्कालीन मराठी वातावरणाशीही स्वत:ला जोडून घ्यायचे होते. मर्ढेकर, रेगे, बेडेकरांपासून ते चित्रे, नेमाडे, कोल्हटकरांपर्यंत प्रत्येकाने त्यासाठी स्वत:ची खास अशी पध्दती शोधलेली दिसते. या सर्वांच्या लेखनातून लेखनसंस्कृती नि:संशय वैविध्यपूर्ण झाली.

या अर्धशतकाच्या उत्तरार्धाने मात्र या तोडीचा एकही प्रभावी लेखक दिला नाही. याची कारणं लेखकाच्या क्षमतेबरोबरच इथल्या वाङ्मयीन संस्कृतीतही आहेत. दैनिकं - साप्ताहिकं - मासिकं - दिवाळी अंक बाजारू झाले. आणि परिणामी प्रसिध्दीची सहजसाधनं उपलब्ध झाल्याने लेखकांची मोठ्या प्रमाणावर पैदास होऊ लागली. लेखनालाच धंदेबाजीचे स्वरूप आले. प्रसिध्दी माध्यमातनं सातत्याने मिळालेली जागा, चार-दोन पुस्तकांवर मिळालेले चिल्लर पुरस्कार - यातून लेखक जमातीला अवास्तव महत्त्व प्राप्त होऊ लागले. लेखन ही एक सांस्कृतिक जबाबदारी आहे, याचे भानच लेखकाला राहीले नाही. प्रतिभाच तात्कालिक होऊन बसली.

नेमाड्यांनी लेखकाचा लेखकराव होण्याविषयी १९६८ साली केलेले विवेचन १९९८ मध्ये तर अधिकच खरे ठरते.

**वाचक - वाचनसंस्कृती आणि अभिरुचीचे प्रश्न**

व्यंकटेश माडगुळकरांच्या 'सरवा' या पुस्तकात एक वाक्य येते. ते असे :

> "कोणत्या वनस्पतींची पानं खावी आणि कोणती
> खाऊ नयेत हे सशांच्या पिलांना त्यांच्या आया
> शिकवतात. माणसांच्या आयांनी पुस्तकांच्या
> पानांबद्दल अशी जागरुकता दाखविल्याचं
> माझ्या पाहण्यात नाही."

आपल्या एकूणच वाचन संस्कृतीवरचं हे बोलकं विधान आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात नव्याने साक्षर झालेला फार मोठा वर्ग 'वाचकपणा'च्या कक्षेत आला आणि स्वाभाविकपणे त्याचे वाचनही तात्कालिक, नैमित्तिक म्हणजे वर्तमानपत्रांच्या पातळीवरचे होते. त्याची अभिरुची आणखी घडायची होती. मिळालेल्या या आयत्या वाचकवर्गाला डोळ्यासमोर ठेवून वर्तमानपत्रांची आखणी होऊ लागली. सोपेपणा, भडकपणा, बटबटीतपणा असलेले जगण्याशी आभासात्मक / काल्पनिक संबंध निर्माण करणारे हे साहित्य या नव्या वाचकाच्या रंजनाच्या हरतऱ्हेच्या गरजा भागविणारे होते.

साक्षरांची झालेली संख्यात्मक वाढ, वाचनालयांचे विस्तार, स्वस्त पेपरबॅक आवृत्यांना सुरुवात, कौटुंबिक मासिकांमध्ये झालेली लक्षणीय वाढ, त्यातील लिखाणाच्या गरजा, वृत्तपत्रांतील व पुरण्यांतील तात्कालिक मजकूर व बहुतांशपणे मनोरंजनाचा मसाला पुरवण्याची चढाओढ आणि दिवाळी अंकांनीही याच अभिरुचीचा केलेला प्रसार यामुळे निम्नस्तरीय साहित्याची निपज मोठ्या प्रमाणावर वाढली. नि अशा लेखकांची मोठी फळीच्या फळी या वाङ्मयव्यवहारात अल्पावधीतच पारंगत झाली. अशा वाचकाची किंवा साहित्याची मुख्य साहित्यप्रवाहाने कधी दखलच घेतली नाही. या सामान्य वाचकवर्गाला घडविणारी समीक्षाही कधी लिहीली गेली नाही. परिणामी हा वाचकवर्ग, त्याच्या लेखकांसह तसाच वाऱ्यावर सोडण्यात आला. दुसरा - अधिक वाङ्मयीन जाण असलेला वाचकवर्गही पुन्हा दोन प्रकारचा आहे. एक - पृष्ठस्तरावर नावाजलेल्या कथा-कादंबऱ्या वाचणारा आणि आपण बरे साहित्य वाचतो, या जाणीवेने सुखावून जाणारा. दुसरा वर्ग मात्र अधिक trained, cultured असा आहे. हा वर्ग विद्यापीठाच्या academic वातावरणात घडलेला आहे. वाङ्मयीन नियतकालिकांनी आणि देशी-विदेशी तत्त्वचर्चांनी त्याची अभिरुची घडलेली आहे. मर्ढेकारांपासून

नवसाहित्याची जी धारा मराठीत अवतरली ती ग्रहण करण्याची क्षमता या वाचकवर्गात होती. विविध प्रकारच्या वाङ्मयीन चळवळी व संस्थातनं त्याचा सक्रिय सहभाग वा पाठिंबा होता. असा हो उच्च अभिरुची बाळगणारा वर्ग दिसतो.

वाचन आणि लेखनाचे हे जे दोन प्रवाह दिसंतात, या दोन धारांनी एकमेकांना स्पर्श करण्याचा प्रसंग कधी आलाच नाही. या दोनही प्रवाहांशी नाते सांगणारे पण तरीही श्रेष्ठ असे साहित्य निर्माण झाले नाही. अपवाद केवळ भाऊ पाध्येंच्या लिखाणाचा करता येईल. पण 'वासूनाका' सारख्या साहित्यकृतीवरुन निर्माण झालेला वाद आपणा सर्वांना माहितीच आहे आणि ज्यांनी ज्यांनी म्हणून या वादात सहभाग घेतला, त्यांचे या दोन अभिरुची न सांधण्यात काही हित होते की काय, न कळे. पण ही संधी हुकली खरी. आणि याची जबाबदार स्वत:ला उच्च अभिरुचीच्या स्तरावर समजणाऱ्या लेखक, वाचकवर्गाचीही तितकीच आहे.

साहित्यातील विविध प्रवाहांमुळे अभिरुचीची विविधताही दिसते. 'सत्यकथा'ने अभिरुचीचा मापदंडच आपल्या लिखाणातून आणि समीक्षेतून पुरवला. त्यातील एकसूरीपणा आणि साचेबंदपणा स्पष्ट झाल्यावर लघुअनियतकालिकांनी त्याला प्रतिक्रिया दिली. आणि नव्या अभिरुचीची पायाभरणी केली.

अभिरुची घडविणारे नियतकालिकांइतकेच आणखी एक माध्यम तितकेच प्रभावी होते - ते म्हणजे कवी संमेलने. करंदीकर - बापट - पाडगांवकरांनी या माध्यमाचा कौशल्याने उपयोग केला. या संदर्भात चित्र्यांनी घेतलेल्या आक्षेपाचा उल्लेख करणं क्रमप्राप्त आहे. चित्र्यांचा आक्षेप होता की, करंदीकर - बापट - पाडगांवकर प्रभृतींनी कवितेचे श्रोते नाही तर बघे निर्माण केले. या विधानाची जातकुळी इतिहासाचार्य राजवाड्यांच्या 'संतांनी महाराष्ट्राला टाळकुटं बनवलं' याच विधानासारखी अर्धसत्य आहे.

श्रोत्यांशी साक्षात संवाद साधणारं वाङ्मयपीठ निदान महाराष्ट्राला तरी नवीन नाही. आणि अशा व्यासपीठांचा वाङ्मयव्यवहारात महत्त्वाचा सहभाग असतो, हे अमान्य करता येणार नाही. आणि आक्षेप जर लेखक-कवीच्या गुणवत्तेवर असेल तर, तोही एवढ्या धसमुसळेपणाने निकालात काढता येणार नाही.

अमुक एक 'वादा'चा प्रतिनिधी म्हणून असे ढीगभर आक्षेप घेता येतील. पण एकूण वाङ्मयीन संस्कृतीची तपासणी करताना लेखकाबरोबराच वाचकाची पातळी आणि त्याच्या भोवतालचीही कारणमीमांसा करणे गरजेचे आहे.

गंभीर साहित्यासाठीचा वाचकवर्ग नेहमीच मर्यादित असतो. पण या शतकाच्या उत्तरार्धात तर स्थिती अधिकच बिकट झाल्याचे दिसते. जीवनातील गतीशीलता आणि विविध माध्यमांचा प्रभाव यामुळे वाचनसंस्कृतीची पिछेहाट होण्याची चिन्हे आहेत. नाईलाजाने, वर्तमानपत्रांच्या पातळीवरच वाचनाची आवड उरणार आहे. अधिक दीर्घ अवकाशाचे, किंवा जे समजून घेण्यासाठी संवेदनशीलता आवश्यक आहे - अशा साहित्यासाठी लागणारी फुरसतच दैनंदिन जीवनातून हरवत चालली आहे. त्याला नाईलाज दिसतो.

**समीक्षा - साहित्य आणि वाचक :-**

स्वातंत्र्योत्तर काळातील महत्त्वाची घटना म्हणजे प्रबोधनाच्या परंपरेचा लोप. प्रबोधनाच्या चळवळीचे विखुरलेपण. महाराष्ट्रामध्ये वैचारिक प्रबोधनाची एक दीर्घ परंपरा दिसते. पण प्रबोधन आणि साहित्य लेखन यांचे थेट आणि साक्षात नाते कधी प्रस्थापित झाले नाही. वास्तविक, समीक्षा ही साहित्याच्या निमित्ताने सांस्कृतिक प्रक्रियेचा वेध घेणारीच बाब आहे. वैचारिक प्रबोधनाचीच ती एक प्रक्रिया आहे. परंतू समीक्षकांनी मात्र तसे मानल्याचे दिसत नाही. नेमाडेही जेव्हा समीक्षेला साहित्यावर पोसलेली आणि म्हणून दुय्यम बाब ठरवतात, तेव्हा आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही.

परिणामी समीक्षेतही काय झाले, तर साहित्याच्या स्वरुप संकल्पनेवर बराच खल झाला. आशय-विषयाबाबतही विशिष्ट आग्रही भूमिका घेतल्या गेल्या. पण साहित्यामागची एकूण प्रक्रिया तपासण्याची स्वतंत्र दृष्टी समीक्षेने निर्माण केली नाही. साहित्य रंजनवादी की जीवनवादी, याच पातळ्यावर चर्चा होत राहिल्या.

समीक्षेच्या विविध पध्दती अस्तित्वात आल्या खऱ्या पण एक तर त्या आयात केलेल्या होत्या आणि त्यापैकी बऱ्याच निव्वळ वाङ्मयीन आणि कप्पेबंद होत्या. शेवटी कोणताही साहित्य किंवा कलाव्यवहार हा विशिष्ट सामाजिक - सांस्कृतिक प्रक्रियांच्या पायावरच अभारलेला असतो. त्या प्रक्रिया समग्रपणे जोवर लक्षात घेतल्या जात नाहीत, तोवर निव्वळ साहित्याची चर्चाही निरर्थक ठरेल.

विविध समीक्षापध्दती आणि सौंदर्यशास्त्राने साहित्यविषयक नवीन विचार आणि संकल्पनांची भर घातली, हे आपण मान्यच केले पाहिजे. त्यातून साहित्यिकांची कलाविषयक जाणही समृध्दच झाली. पण त्याला इथल्या सांस्कृतिक प्रक्रियांचे जिवंत संदर्भ लाभले नाहीत. नेमाड्यांची देशीवादाची मांडणीही पाश्चात्य धर्तीवरचीच आहे, ते विसरता येणार नाही.

दुसरे असे की, सगळा समीक्षाविचार हा ॲकॅडमिक वर्तुळापुरताच मर्यादित राहिला. सामान्य वाचकवर्ग ध्यानात घेऊन कधी समीक्षेची मांडणी झाली नाही. सामान्यांच्या वाङ्मयीन अभिरुचीचा प्रश्न समीक्षेने वाऱ्यावरच सोडून दिला. या अर्धशतकातील समीक्षाही विविध अंगांनी बहरलेली दिसते याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे विविध वाङ्मयीन प्रवाहांचा उदय आणि त्याला स्थान देणारी दर्जेदार नियतकालिके. सत्यकथा, अभिरुची, साहित्य, हंस, लघुअनियतकालिकांबरोबरच 'आलोचना' सारखे खास समीक्षेला वाहिलेले नियतकालिक असावे - यातच समीक्षेची समृध्दी दिसते.

अलिकडच्या दोन दशकांमध्ये वाङ्मयीन नियतकालिकांची संख्या तुलनेने रोडावल्याची दिसते. त्याचा परिणाम समीक्षापर लेखनावरही झालेला दिसतो. 'अनुष्टुभ्' ने मात्र निष्ठेने आणि सातत्याने

समीक्षेला स्थान दिले आहे.

'अभिधा' या नुकत्याच बंद पडलेल्या अनियतकालिकाचा मी आवर्जून उल्ले करीन. यात श्रीधर तिळवे या तरुणाने नव्या वाङ्मयीन पिढीसाठी मूलभूत महत्त्वाची वाङ्मयीन फेरमांडणी केल्याचे दिसते. वाङ्मयीन नियतकालिकांव्यतिरिक्त विद्यापीठीय/ॲकॅडमिक सेमिनार्समधूनही विविध विषयांवरची उत्तम समीक्षा लाभली आहे. त्यातील चर्चाही, त्यातील आरोप - प्रत्यारोपांनिशी, वाङ्मयीन समज वाढावी यासाठी फलप्रदच ठरल्या आहेत.

वृत्तपत्रांच्या पुरवण्यातून परीक्षणाच्या नावाखाली छापला जाणारा मजकूर मात्र बराचसा उथळ असतो. त्याची दखल न घेतलेलेच बरे. याच अर्धशतकात सौंदर्यशास्त्र, साहित्यशास्त्र, भाषाशास्त्र, शैलीविचार, मार्क्सवाद, पाश्चात्य नवसमीक्षा, चिन्हमीमांसा... अशा अनेकविध समीक्षादृष्टींचे ग्रंथही प्रकाशित झाले. विविध टप्प्यांवर मराठीतील पूर्वलेखनाची, प्रवाह आणि वादांची आवर्जून फेरतपासणीही झाल्याचे दिसते. या समीक्षेने उत्तम साहित्यकृतींसाठी सदैव आवश्यक भूमी तयार केली आहे.

**विविध वाङ्मयीन प्रवाह आणि प्रकार**

याच अर्धशतकाच्या सुरुवातीला नवसाहित्य बहरु लागले होते. नवकथा आणि नवकवितेने तर आशय आणि आविष्कारांच्या नवनवीन जाणीव मराठी साहित्याला प्रथमत: करुन दिल्या. प्रचंड विरोध होऊनही आपल्या कसानिशी हे साहित्य टिकून राहिले आणि नंतर आपला विशिष्ट वाचकवर्गही निर्माण केला.

नवकादंबरी, प्रादेशिक ग्रामीण कादंबरी, लघुकादंबरी, कादंबरीच्या अंगाने जाणारी दीर्घकथा, विनोदी लेखन, लघुकथा, दीर्घकथा, भयकथा, विज्ञानकथा, मानसशास्त्रीय अधिष्ठान असलेली कथा, वास्तववादी लेखन, संज्ञाप्रवाही लेखन, विविध सामाजिक स्तरातील आत्मकथने वा अल्पचरित्रे, चरित्रे, दलित नाटक, दलित कविता, राजकीय-ऐतिहासीक पौराणीक विषयावरील कादंबऱ्या, अलिकडची 'कळ' सारखी अत्यंत प्रयोगधर्मी कादंबरी, ग्रामीण व स्त्रीवादी साहित्य, स्त्रीयांचे साहित्य, व्यक्तीचित्रे, अस्तित्ववादी कथा व कादंबऱ्या, अतिवास्तववादी कथा, ललितलेखन, रिपोर्ताज, प्रयोगशील नाटके, कवितांतही असंख्य आशय-शैली, याशिवाय मार्क्सवाद, देशीवाद, जनवाद, अस्तित्ववाद ..... असे विविध वाङ्मयीन प्रवाह, वाङ्मय प्रकार याच पाच दशकांत मराठीत अवतरले. या सर्वांतून मराठी साहित्य नि:संशय समृध्द झाले.

**प्रकाशन व्यवसाय आणि नियतकालिके :-**

साधनांच्या सहजतेमुळे आणि त्यांतील तांत्रिक प्रगतीमुळे या अर्धशतकात प्रकाशन व्यवसाय नि एकूणच ग्रंथव्यवहारही भरभराटीला आला. मौज, पॉप्युलर, कॉन्टिनेन्टल, देशमुख अँड कंपनी अशा बड्या प्रकाशनसंस्थांनी नवीन, प्रयोगधर्मी दर्जेदार लेखनाला समोर आणले. अनेक छोट्या-मोठ्या शहरातूनही प्रकाशक पुढे आले. आणि पुण्या-मुंबईबाहेरही प्रकाशनव्यवसायाचे जाळे विकसीत झाले. याची दोन कारणं होती. एक म्हणजे विविध सामाजिक स्तर आणि प्रदेशांतून झालेला नवीन लेखकवर्गाचा उदय आणि दुसरे म्हणजे साक्षरता आणि मध्यमवर्गाच्या वाढीबरोबर प्रचंड मोठ्या संख्येने उपलब्ध झालेला वाचकवर्ग.

विविध स्थानिक वाङ्मयीन संस्था, ग्रंथप्रदर्शनं, ग्रंथचर्चा, पुस्तक परीक्षणं या गोष्टींनी या वाचकवर्गाचं पोषणच केलं असलं तरी गुणवत्तेच्या पातळीवर मात्र हा वाचकवर्ग सुमार दर्जाचाच राहिला. 'ग्रंथाली' सारखी वाचकाच्या अंगाने जाणारी ग्रंथचळवळ, या दिशेने गेली २५ वर्षे प्रयत्न करीत असली तरी महाराष्ट्राच्या पसाऱ्यात हे काम अपुरेच ठरणारे आहे. लोकसंख्येच्या आणि साक्षरतेच्या प्रमाणात पुस्तकांचा खप वरकरणी प्रचंड दिसत असला तरी अनेक उत्तम पुस्तकांच्या पहिल्याच आवृत्या आठ आठ - दहा दहा वर्षेपर्यंत जात नाही असे चित्र दिसतं. जाडजूड अभ्यासपूर्ण ग्रंथांच्या नशिबी गोदामांची धूळ किंवा ग्रंथालयाची अलमारी येते. कलकत्यासारखी प्रचंड ग्रंथजत्रा, एखाद्या बंगाली लेखकाच्या अक्षरश: दोन दोन लाख प्रती जाणे किंवा नोबेल मिळाल्यानंतर का असेना चार दिवसांत अमर्त्य सेनांच्या ३० हजार पुस्तकांची वाचक नोंदणी करतात. याच्याशी तुलना करु जाता मराठीतले चित्र निश्चितच सुखावह नाही.

या सगळ्यामागे अनेक सामाजिक कारणं आहेत. जशी जीवनातली गतीशीलतेमुळे वाचनासाठी वेळ व धीर वाचकाकडे उरला नाही, सामान्य वाचकाची अविकसीत असलेली वाङ्मयीन जाण, ग्रंथांच्या वाढत्या किंमती, वाचनालयाचे विस्तार, टिव्ही - चित्रपटादी माध्यमांचा वाढता प्रभाव व त्यांतून वाङ्मयासारख्या शब्दमाध्यमाला निर्माण झालेला गंभीर धोका, सुशिक्षित मध्यमवर्गाच्या पातळीवर वाङ्मयीन प्रबोधन करण्यासाठी दर्जेदार नियतकालिकांचा अभाव, मराठी संस्कृतीचा ऱ्हास, वाङ्मय क्षेत्रांतील अपप्रवृत्ती, शैक्षणिक व ॲकॅडमिक स्तरावरचा वाङ्मयीन कप्पेबंदपणा इत्यादी. कारणांची यादी खूपच लांबण्यासारखी आहे. मराठीत सगळ्यात जास्त, सगळ्या स्तरावरचा वाचकवर्ग लाभलेले लेखक दोनच व.पु. आणि पु.ल. पण एकूण सरासरी वाचनस्तर सुमारच राहिलेला आहे. अर्थात प्रत्येकच काळात चोखंदळ, जाणकार वाचकाची संख्या तुलनेने कमीच असणार, हे इथे गृहीतच आहे.

दैनिकांचा अवकाश आणि कालदृष्टी चिंचोळीच असली तरी त्यांचेही साहित्यव्यवहारात एक विशिष्ट स्थान असते. पण त्यातील वाङ्मयीन मजकूराचे स्वरुप कधी सभा-संमेलनांचे रिपोर्टस, साहित्यिकावर गौरवलेख किंवा उथळ पुस्तक परीक्षणं या पलिकडे जात नाही. अर्थात महाराष्ट्र टाइम्स सारख्या एखाद-दुसऱ्या दैनिकाने एकेकाळी आपल्या पुरवण्यांतून दिलेल्या दर्जेदार मजकूराचा व राबविलेल्या कल्पक उपक्रमांचा इथे आवर्जून उल्लेख करावा लागेल.

साप्ताहिक-पाक्षिक वा मासिकांचीही साधारणत: इतर दैनिकांसारखीच स्थिती असते. त्यामुळे त्याचा वेगळा उल्लेख करण्याची गरज नाही. वाङ्मयीन नियतकालिकांच्या बाबतीत या अर्धशतकाने फारच

चढउतार पाहिले. सत्यकथा, अभिरुची, हंस, साहित्य, आलोचना, कवितारती, लघु अनियतकालिकं यांची उत्कर्षावस्था आणि विरामबिंदू यांचा साक्षीदार हाच काळ आहे.

प्रतिष्ठान, पंचधारा... अशी महाराष्ट्राच्या विविध भागातून वा महाराष्ट्राबाहेरुन नियतकालिकं निघत असली तरी त्यांची स्थितीही फारशी समाधानकारक नाही. ललित, साहित्यसूची अशा नियतकालिकांचे स्वरुपच वाङ्मय आणि व्यवसायाला स्पर्श करणारे आहे. त्यातील माहितीपूर्णता वाङ्ययीन घटनांची, ग्रंथांची नोंद घेणारी आहे. या विशिष्ट कार्यक्षेत्रात त्याचे महत्त्वही निर्विवादच आहे.

'अनुष्टुभ्' सारख्या आजच्या आघाडीच्या वाङ्मयीन नियतकालिकांत दर्जेदार साहित्याचा काहीसा अभावच दिसतो. आणि याचं कारण संपादनाच्या पातळीवरचं नसून साहित्याबाबत नव्या पिढीत नसलेलं गांभीर्य हे आहे. त्यामुळे तेच तेच लेखक नाईलाजाने पुन्हा पुन्हा दिसायला लागतात. आणि त्यामुळे आपोआपच वाङ्मयीन नियतकालिक ही कोणाची तरी मिरासदारी वाटण्याइतपत एकाकी होतं. याचा प्रत्यय मी अल्पजीवी ठरलेल्या 'अभिधा' या अनियतकालिकाच्या निमित्ताने घेतला आहे.

पण या सगळ्या पार्श्वभूमीवर, मराठीतल्या सर्वाधिक चढउतार पाहिलेल्या 'अभिरुची' या नियतकालिकाचे पुनरुज्जीवन ही एक आशादायक घटना मानायला हरकत नाही. पण आजघडीला चांगल्या वाङ्मयीन नियतकालिकांचा संख्यात्मक आभाव दिसतो, ही बाब गांभीर्याने घ्यायला हवी.

मर्ढेकरांची पिढी असो की नेमाडे-चित्र्यांची, वाङ्मयीन पिढीची (लेखक आणि वाचक दोन्ही) जडणघडण ही नियतकालिकं किंवा अनियतकालिकांनी केली आहे, असे इतिहास सांगतो, आजघडीला नव्या पिढीला असं वाङ्मयीन व्यासपीठ नाही. ही नक्कीच एक गंभीर घटना आहे.

नियतकालिकांचा विषय दिवाळी अंकाशिवाय पूर्णच होणार नाही. महाराष्ट्रात आजमितीला सुमारे ३५० हूनही अधिक दिवाळी अंक निघतात. एकेकाळी तुफान वाचकप्रियता, उत्सुकता आणि दर्जेदार असलेल्या दिवाळी अंक संस्कृतीची गेल्या काही वर्षात वेगाने घसरण झाली आहे. त्याला बाजारू, धंदेवाईक स्वरुप केव्हाच आले आहे. जाहिरातीतून वर्षभराचा नफा कमविण्याचा हा एक उत्तम धंदा असून यांत या कलेत पारंगत कुणीही, कुठल्याही संपादकीय भूमिका व समजेशिवाय, विनादिक्कत उतरताना व यशस्वी होताना दिसतो, यातच सगळे आले. अर्थात या विधानातून दोन-चार सन्माननीय अपवाद वगळले आहेतच. एखाद्या विशिष्ट विषयाला वाहिलेल्या अंकांनी गंभीर चर्चेचा चांगला पायंडा पाडल्याचे दिसते. आरोग्य, निसर्ग, घर... अशा विषयांचेच कायमचे असलेले दिवाळी अंकही बऱ्यापैकी आपलं वैशिष्ट टिकवून आहेत.

**संमेलने - मेळावे - साहित्य संस्था आणि उत्सव संस्कृती**

संमेलनांचे वाङ्मय-संस्कृतीत एक विशिष्ट स्थान असते, आणि महत्त्वही. या काळात स्थानिक आणि प्रादेशीक पातळ्यांवर विविध साहित्य संस्था उदयाला आल्या. या संस्थांची ध्येय-धोरणं, स्वरुप आणि दृष्टी अर्थातच मर्यादित होती. स्थानिक पातळीवरील उत्तम प्रतिभा त्यातून समोर आली, असं चित्रही अपवादानेच दिसतं. अशी अनेक व्यासपीठं उभारली गेली पण त्यातून स्थानिक पातळीवरही भरीव, मूलभूत महत्त्वाची कामगिरी प्रत्ययाला आली नाही. सहज आयती संधी मिळते आहे, म्हणून अनेक सुमार लोक मात्र लेखक म्हणून पुढे आले. सततच्या संमेलन-मेळावे कार्यक्रमांनी आणि त्याच्या प्रसिध्दतंत्रांनी या सर्वाला बेसुमार प्रसिध्दी आणि ग्लॅमरही दिलं.

थोड्या बहुत फरकाने याच गोष्टी राज्य वा अखिल भारतीय स्तरावरील संमेलनांतही घडत राहिल्या. ग्लॅमर आणि प्रसिध्दीतंत्राचा सोस तर पुढे इतका वाढला की अखिल भारतीय साहित्य संमेलने धनवंत आणि राजकारण्यांची केव्हा बटीक बनली, हे कळलेही नाही. त्यापेक्षा पेप्सी किंवा कोका कोलाकडून एखादे साहित्य संमेलन प्रायोजित करून घेणे बरे, अशी स्थिती आहे.

साहित्य संमेलने अवाङ्मयीन शक्तींच्या हातात गेल्याने संयोजन दृष्टीचा अभाव, त्याच त्या विषयांवर वरवरच्या चर्चा, अदृश्य पातळीवरची अर्थकारणं व राजकारणं, थिल्लर उत्सवी प्रेक्षक यातनं संमेलनांचा दर्जा सतत घसरत राहिला. लोकांचा प्रतिसाद वाढताना दिसतो तो विविध भागातल्या लोकांना संमेलनांबद्दल वाटणारं अप्रूप म्हणून. सुशिक्षित मध्यमवर्गाच्या प्रमाणात ग्रंथविक्रीही वाढल्याची दिसते पण पुन्हा कोणते ग्रंथ विकले जातात, हे पाहिले तर त्याची गुणवत्ता सहज लक्षात येईल. ग्रंथविक्रीबरोबरच ग्रंथचौर्याचे कसबही वाढल्याचे प्रत्ययाला येते.

कवीसंमेलन या प्रकाराबद्दल तर बोलायलाच नको. काव्यवाचनाचा सोस नव्या-जुन्या पिढीतही इतका दिसतो की त्यात कविताच हरवून जाते. एके काळी अशा व्यासपीठावरून बालकवी ठोमरे पुढे आले. गेल्या ५० वर्षात असे एकही नाव व्यासपीठाने मराठी कवितेला दिलेले नाही.

बापट - करंदीकर - पाडगांवकरांच्या काव्यवाचनसंस्कृतीचा वर तपशीलात विचार केला आहेच. पण अलिकडे तर त्याच्या अनेक भ्रष्ट आवृत्त्या महाराष्ट्रात सुखनैव बाडांनिशी भ्रमण करताना दिसतात. प्रेक्षक जिंकण्याचे कौशल्य वाढले आहे, एवढाच त्याचा अर्थ होतो.

जागोजाग भरणारी जिल्हानिहाय किंवा विभागीय साहित्यसंमेलने, व्याख्यानमाला, पुस्तक प्रकाशनांचे समारंभ, कविसंमेलन वा कथाकथनाचे कार्यक्रम... या सगळ्यामुळे सांस्कृतिक - वाङ्मयीन चैतन्य निर्माण झाल्यासारखे दिसते खरे पण त्यातील उत्साह निव्वळ उत्सवी स्वरुपाचा असतो. दीर्घकालीन वाङमयीन संस्कृतीच्या दृष्टीने तर तो निरुपयोगीच आहे.

**शिक्षणपध्दती आणि विद्यापीठे :-**

बाल आणि कुमारांसाठीचे उत्तम वाङ्मय मराठीत मुळातच

कमी आहे. आणि म्हणून काळासोबत बदलणारं मनोविश्व त्यातून प्रतित होण्याचा प्रश्नही येत नाही. परिणामी शालेय स्तरावर विद्यार्थ्यांची वाङ्मयीन जाण समृध्द व्हावी अशी पाठ्यपुस्तकंही नाहीत आणि खुद्द शिक्षकवर्गही याबाबत उदासीन आहे.

या संवेदनशील वयात लहान मुलांच्या कानावर पडणाऱ्या परी, राक्षस वा राजाराण्यांच्या कथा, श्यामची आई किंवा महापुरुषांच्या गोष्टी, चांदोमामा भागलास का किंवा नाच रे मोरा... यातलं लहान मुलाचं पारंपरिक भावविश्व आज अप्रस्तुतच आहे. काळ आणि अवकाश दोन्ही पातळ्यांवर

माध्यमिक नि उच्च माध्यमिक स्तरावर तर आणखी भलताच प्रकार. सगळे कालखंड आणि सगळे प्रदेश यांना स्थान देण्याच्या अजब निकषापायी अक्षरशः दुय्यम - तिय्यम दर्जाचे लेखक मुलांच्या माथी मारले गेल्याचे दिसते. म्हणजे काही लेखकांना तर निव्वळ पाठ्यपुस्तक मंडळांनी थोर केले आहे. अशा परिस्थितीत साहित्याची आवड मुलांमध्ये निर्माण व्हावी, अशी कोणतीही व्यवस्था आज या स्तरावर अस्तित्वात नाही.

शिवाय, भाषा व कलाशाखेतील विषयांचे शिक्षणक्रमातील दुय्यम स्थान, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, शिक्षकवर्ग यांची अनास्था... वगैरे कारणांनी याला या पूर्वीच प्रतिकूल भूमी निर्माण केली आहे.

जगभराच्या ॲकॅडमिक परिसरात आंतरज्ञान शाखीय अभ्यास आणि भाषसहीत कलाशाखेतील अन्यही विषयांचे नव्याने महत्त्व प्रस्थापित होत असताना इथल्या विद्यापीठ व शिक्षणविदांना अद्याप जाग आल्याचे दिसत नाही. गेल्या तीन दशकांत साहित्य-भाषा-समाज-संस्कृतीच्या परिसरात नव्याने विविधांगी, मूलभूत चर्चा झाली आहे. त्यातील भाषाविषयक तत्त्वचर्चा तर एकूण जगण्याविषयीच नवी अंतदृष्टी पुरविणारी आहे. याचा दूरवर गंधही विद्यापीठीय शिक्षणाच्या आराखड्यात दिसत नाही. मराठी आणि इंग्लीश यांच्या अभ्यासक्रमांतील दृष्टींची तुलना केली तर मराठीचे हे मागासलेपण सहज ध्यानात यावे. बी.ए./एम.ए. स्तरावर तरी एखाद- दोन पेपर तरी अधिकाधिक समकालीन असावेत, असा प्रयत्न व्हायला हवा. वास्तविक हा स्तर अधिकाधिक प्रयोगशील राखून साहित्यविषयक जाणीवेचा कस वाढवता येईल. पण पायाच कचा असल्याने पुढचेही सर्व अवघड होऊन बसले आहे.

शिवाय, बदलते वास्तव आणि शैक्षणिक उद्देश, व्याख्यानपध्दतीच्या मर्यादा, प्राध्यापकांकडे नसलेली नवी दृष्टी, भाषा विषयाचे व्यावहारीक करिअरिस्टीक युगात नसलेले महत्त्व, अभ्यासक्रमात हितसंबंधियांची पुस्तकं लावण्याचे राजकारण... अशा गुंतागुंतीमुळे ठराविक साच्याच्या पलीकडे विद्यापीठीय स्तरावरही काही होत नाही. परिणामी मराठी विषयात पदवी आणि पदव्युत्तर शिक्षण घेऊनही विद्यार्थी वाङ्मयीन दृष्ट्या निर्बुध्दच निपजतो.

**शासकीय प्रोत्साहन आणि वाङ्मय संस्कृती :-**

१९६० ला महाराष्ट्र राज्याची मुहूर्तमेढ घातली गेली आणि तत्कालीन महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी विविध वाङ्मयीन आणि सांस्कृतिक उपक्रमांना चालना दिली.

साहित्य संस्कृती मंडळ, भाषा संचलनालय, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, ग्रंथालय संचालनालय, शासनाचे साहित्य पुरस्कार, राज्यस्तरीय नाट्यस्पर्धा, लोकवाङ्मयाचे संकलन, विश्वकोश निर्मिती, अलिकडची राज्य मराठी विकास संस्था... असे एक ना अनेक संस्था आणि उपक्रम शासनाद्वारे व शासकीय पाठिंब्याने चालत आहेत. पण त्यातून वाङ्मय संस्कृतीऐवजी अनुदान संस्कृती मात्र बहरली. गावागावातून आणि शाळाशाळातून शासन पाठिंब्याने आज असंख्य वाचनालये महाराष्ट्रभर उभी आहेत. त्यांना वर्षाकाठी ठराविक रक्कम अनुदानापोटी दिली जाते. त्याचा प्रत्यक्षात व्यय कसा होतो? कोणती पुस्तके घेतली जातात? वाचकाचा वाचनस्तर काय? तो सुधारण्याची योजना काय? असे अनेकविध प्रश्न विचारता येतील. ज्यांची उत्तरे नक्कीच भूषणावह नाहीत. ही झाली छोट्या वाचनालयाची स्थिती. मोठ्या वाचनालयांची स्थिती तर याहूनही बिकट आहे. एक म्हणजे ही वाचनालये पुस्तक वाचकवर्गाच्या संख्यात्मक दृष्टीने मोठी आहेत. पुन्हा तेच साक्षरतेच्या प्रमाणाता वाढता वाचकवर्ग, त्याच्याकडून होणारी विविध पुस्तकांची मागणी, वाचनालयीन कर्मचाऱ्यांची अपुरी संख्या व त्याहूनही अपुरे त्यांचे पगार, वाचनालयाच्या वास्तूंची स्थिती, पुस्तकं जतन करण्यासाठी कायमस्वरुपी योजना नसणे. विविध प्रकारच्या सोयी सुविधांचा अभाव, वाचकवर्गावर पडणारा मासिक वर्गणीचा भार, कर्मचाऱ्यांकडून पुरवली जाणारी सेवाही असामाधानकारक, वर्षानुवर्षे बैठका न होऊन महत्त्वाचे निर्णय तसेच पडून राहाणे... अशा असंख्य प्रश्नांनी मोठी वाचनालये ग्रासली आहेत. याचा अर्थ, अनुदान संस्कृती अनुदानित संस्था वा उपक्रमाच्या नेहमीच हिताची असते असे नाही.

तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशींच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची स्थापना केली गेली. विश्वकोशासारखा महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेऊन तज्ज्ञांचे परिश्रम खर्ची घातले. ४० वर्षानंतर झाले काय? तर प्रकल्प अद्यापही पुरा होऊ शकलेला नाही आणि प्रकाशित खंडाच्या पहिल्याच आवृत्तीच्या प्रती केवळ १२५ रुपये एवढी कमी किंमत ठेवूनही गोदामात धूळ खात पडून आहेत. मराठी, अन्य भारतीय भाषा, आणि जागतिक स्तरावरील उत्तम ग्रंथ मराठीत आणले गेले. भाषा संचालनालयाकडून किंवा अलीकडे राज्य मराठी विकास संस्थेकडून पारिभाषिक स्तरावरचे प्रश्न सोडवून मराठीला समकालीन वातावरणात सक्षम बनविण्याचे प्रयत्न होत आहेत. पण तेही अपुरे आणि निरर्थक ठरावेत अशी स्थिती आहे. लोकवाङ्मय संकलनाच्या कामातून अनेक पुस्तके साकारली पण त्यातून हाती मात्र काहीच लागले नाही.

नवलेखकांना पुस्तक प्रकाशनासाठी अनुदान हा तर आजमितीला निव्वळ विनोदविषय बनला आहे. हजारोंनी अनुदानार्थ संहिता येतात. शेकडोंनी त्याला मान्यताही दिली जाते. पुस्तके छापूनही येतात. पण त्याचा दर्जा काय असतो? हा प्रश्न न विचारलेलाच बरा. गेल्या

४० वर्षांतील अनुदानित पुस्तकांची यादी केली तर मराठी साहित्यात मोलाची ठरतील अशी चार दोन पुस्तके दाखवून देणंही कठीण आहे. अनुदान समितीत घुसलेल्या अपप्रवृत्ती हेच याचे मूळ दुखणे आहे. त्यावर आणखी इलाज झालेला नाही.

साहित्यासाठी दिले जाणारे पुरस्कार हाही असाच वादग्रस्त विषय. शासनाची ही पारितोषिकं एक तर वेळेवर जाहीर होत नाहीत. आणि पारितोषिक प्राप्त ग्रंथांची सलग यादी वाचल्यास त्यातील दर्जाबाबत निकषाची एकसूत्रताही हाती लागत नाही. बहुतेकांना खुष ठेवण्याचेच धोरण त्यामागे दिसते. 'सुक्यासोबत ओलेही जळते' या धर्तीवर चांगल्यासोबत वाईटाला/दुय्यमाला पुरस्कार कसा काय मिळतो? हा प्रश्न विचारता येईल.

या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र फाऊंडेशनने गेल्या काही वर्षांत दर्जेदार लेखक, प्रकाशक, नियतकालिक, ग्रंथ, विचारवंत आदींना भरघोस रकमेची पारितोषिकं देऊन चांगली सुरुवात केल्याचे दिसते.

**. भारताचा वाङ्मयीन परिसर आणि मराठी साहित्य.**

अन्य भारतीय भाषांतील साहित्यिकासाठी मोठ्या रकमेचा एकही पुरस्कार असू नये, याबद्दल ज्येष्ठ कवी विं.दा.करंदीकर यांनी काही वर्षापूर्वी खंत व्यक्त केली होती. प्रसंग होता कोणार्क पुरस्कार स्वीकारण्याचा. मध्य प्रदेश सरकारतर्फेही असा पुरस्कार दिला जातो. विंदाची खंत नक्कीच विचारार्ह आहे.

आजतागायत मराठीत केवळ दोन साहित्यिकांनाच, खांडेकर आणि शिरवाडकर, ज्ञानपीठ हा मानाचा पुरस्कार प्राप्त झाला आहे. साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त साहित्यीक वा समीक्षकांची नावंही बोटावर मोजण्याइतकीच भरतील. बुकर किंवा नोबेलचे तर मग नावंही नको. अशी स्थिती आहे.

मराठी भाषेतील किती लेखक भाषांतरित होऊन अन्य भारतीय भाषांत, किंवा जागतिक स्तरावर गेले आहेत? जगातल्या कोपऱ्यातल्या एखाद्या विद्यापीठात, जगभरातल्या संग्रहित दलित कवींच्या यादीत आमचा एखादा कवी पोहोंचला, तर त्यातच किती धन्यता वाटते आम्हाला! साहित्याच्या मोलाने जागतिक वाङ्मयात बसण्याची आमची लायकी नाही, ही वस्तुस्थिती आहे. तेंडुलकर, नेमाडे, गाडगीळ आणि वैचारिक स्वतंत्र ग्रंथांत मर्ढेकर, रा.भा. पाटणकर (दोघेही सौंदर्यशास्त्र) सोडल्यास भारतीय साहित्यविश्वातही आमचा दबदबा नाही.

तथापि साहित्य अकादमी, नॅशनल बुक ट्रस्ट यांसारख्या संस्थांमुळे भारतीय भाषांतील मौलिक साहित्याचे आदान प्रदान होण्याला चालना मिळाली आहे. पण अजूनही बरेच काम करण्यासारखे आहे. वसंत पळशीकरांसारख्या चार दोन महत्त्वाच्या लेखकांचे विचारग्रंथ अनुवादित व्हायला हवेत. काही भारतीय भाषांतील नियतकालिकांतून क्वचित येणारे भाषांतरित मराठी साहित्य अनेकदा एखाद्या ग्रूपचेच असते अथवा सतत बातम्यांत असणाऱ्या दुय्यम दर्जाच्या लेखकांचे. साहित्य अकादमीच्या Indian Literature किंवा समकालीन भारतीय साहित्य या नियतकालिकांतून असा प्रकार आढळतो.

मराठी विश्वामध्ये मराठी साहित्यांत नक्कीच विविधता आणि गुणवत्ता आहे. पण एकदा मराठीच्या कक्षा ओलांडून अन्य भारतीय भाषांच्या परिसरांत मराठीचे स्थान आम्ही ठरवू लागतो, तेव्हा खूप काही बाद करावे लागते. आणि म्हणून जागतिक स्तरावरची चर्चा करणे वास्तविक निरर्थक आहे. (अशी चर्चा केवळ जागतिक मराठी परिषदांतूनच होऊ शकते.) याचे कारण इथल्या लेखकाचा या वाढत्या विश्वाशी कधी संबंधच प्रस्थापित झालेला नाही. मराठी लेखकाचे वास्तव ज्या प्रमाणात विस्तारेल, त्या वास्तवाला सामोरी जाणारी आमची भाषिक क्षमता आणि वैयक्तिक निर्मितीशीलता टिकेल, कसदार होईल - त्या प्रमाणात आपोआपच मराठी साहित्याचे अंगणही विस्तारेल. पण सद्यस्थितीत ही शक्यता दूरवरही दिसत नाही.

ज्ञानेश्वरांचे पसायदान युनोची प्रार्थना ठरावे, तुकाराम आधुनिक किंवा "Says Tuka' मध्ये Post-modern कवी आहे, अशी विधाने आम्ही मराठीच्या न्यूनगंडातूनच करतो आहोत. जागतिक स्तरावर expose होताना 'आम्ही मर्त्य आहोत' हे स्वीकारायलाही आम्ही तयार नाही आहोत.

**. साहित्यातील राजकारण.**

राजकारण हा या युगाचा जणू स्थायीभावच बनला आहे. साहित्यही त्याला अपवाद नाही. कुणाला मोठं करायचं, कुणावर टिका करायची किंवा कुणाला दुर्लक्षित करायचं/कुणाला पुरस्कार द्यायचा, कुणाला मिळू द्यायचा नाही अशा सगळ्या स्तरांवर खेळी खेळली जाते. वैयक्तिक हेवेदावे, ग्रूपीझम चालतो आणि यांत लेखक-समीक्षक-संस्था-प्रकाशक-पत्रकार-वाङ्मय मंडळाचे पदाधिकारी सर्वच येतात. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदासाठीच्या निवडणुका ही तर जाहीर वादस्थळे आहेत वाद आणि मतभेद असणारच. पण त्यांतील निकोपपण हरवले आहे.

राजकारणी लोकांनीही साहित्य संमेलनांना राजकीय व्यासपीठच बनविले आहे. (त्यामुळे निवडणुका वर्षावर आल्यावर दादरचे संमेलन रंगणार-यात शंकाच नाही.)

**. अर्थकारण : साहित्यातले आणि बाहेरचे.**

प्रकाशन व्यवसाय विस्तारला तरी मराठी लेखकाची रॉयल्टी जेमतेमच राहिली आहे. ('महानायक' साठी विश्वास पाटील यांना १० लाख रुपये मिळाले, ही बातमी खरी धरली, तर तो अपवाद.) चांगल्या लेखकाने (चांगल्या अर्थाने) साहित्यावर पोट भरावे, अशी स्थिती नाही.

गंभीर लेखन छापणं ही प्रकाशकाला रिस्क वाटते. किंवा मग निव्वळ अनुदानावर किंवा वाचनालयांवर अवलंबून रहावे लागते. अलीकडे पैसे देऊन स्वतःची पुस्तके छापून घेणारी लेखकाची जात उदयाला आल्याने प्रकाशनाचा धंदा बरा चाललेला दिसतो. उत्तम प्रकाशकांना मात्र एक तर पुस्तकांच्या किंमती वाढविण्याशिवाय किंवा एक चांगले पुस्तक काढण्यासाठी चार धंदेवाईक पुस्तके काढण्याशिवाय पर्याय दिसत नाही.

चांगल्या पुस्तकांची पैदास ही अशा आर्थिक गणितांतून वाट काढत करावी लागणार, हे उघडच आहे.

दुसरी अडचण म्हणजे, लहान प्रकाशकांना वितरणासाठी अन्य यंत्रणेवर अवलंबून रहावे लागते. वितरणाच्या साखळीतील घटक वाढले की त्या प्रमाणात त्यांना द्याव्या लागणाऱ्या हिश्श्याचेही प्रमाण वाढते. आणि हे दुष्टचक्र गृहीत धरुन पुस्तकाच्या किंमती मूळ उत्पादनाच्या ४ ते ५ पट वाढवाव्या लागतात. यात प्रकाशकाचा नेहमीच फायदा असतो, असे ढोबळ समीकरण मांडता येणार नाही. विक्रेते आज सर्रासपणे प्रत्येक पुस्तकामागे ३५ ते ४० टक्के कमिशन घेतात.

किंमत वाढवली तर सामान्यांना पुस्तके परवडत नाहीत. छोट्या वाचनालयांनाही वर्गणीदार-वाचकाच्या मागण्या गृहीत धरणे भाग असल्याने, जास्त किंमतीची दर्जेदार पुस्तके घेणे अव्यवहार्य वाटते. किंमत कमी ठेवली तर त्या प्रमाणात कमिशन कमी असल्याने अशा पुस्तकांबाबत वितरक वा विक्रेता उदासीन दिसतो. म्हणजे प्रकाशकासमोरचा मधला मार्ग म्हणजे किंमत वाढवावी लागणारच पण अगदीच तोट्यात जाऊ नये यासाठी पुस्तकांचे मोजक्याच ठिकाणी वितरण करणे. परिणामी चांगली पुस्तके महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत उपलब्ध होत नाहीत. आणि वाढलेल्या किंमतीची पुस्तके बाहेरगावाहून मागविण्यासाठी चांगला वाचकसुध्दा किती तसदी घेणार नि झळ सोसणार?

पुस्तक प्रकाशन-वितरणामागच्या अर्थकारणाचे हे दुष्टचक्र ग्रंथव्यवहाराला धंदेवाईक नि बाजारुपणाच्या खाईत लोटणारे आहे आणि सर्वांचाच याला नाईलाज दिसतो.

आणि दुसरी याहूनही महत्त्वाची बाब साहित्य व्यवहाराबाहेरील अर्थकारणाची आहे. लोकांचे सरासरी उत्पन्न वाढले असले तरी तेही लोकांचे दैनंदिन जीवन सुसह्य करणारे नाही. दारिद्र्यरेषा पुसली गेलेली नाही. बेकारीने कळस गाठला आहे. इतर कारणे आहेतच. लोकांची शैक्षणिक गुणवत्ता वाढलेली नाही. जीवनातील गती आणि दैनंदिन प्रश्न गंभीर वाचनाला फुरसत देणारे नाहीत. टीव्ही, चित्रपटादी प्रसार माध्यमांच्या प्रभावासमोर शब्द माध्यम निस्तेज ठरू लागले आहे. लोकांचे सांस्कृतिक अग्रक्रमच बदलले आहेत. संवेदनशीलतेचा कोप होतो आहे. प्रश्न गंभीर बनतो आहे. साहित्याच्या बाजूने बोलायचे तर साहित्य व्यवहाराच्या सगळ्याच पातळ्यांवर संकट निर्माण झाले आहे आणि समग्रपणे बोलायचे झाले तर त्यावाचून कुणाचे अडते आहे, असे कुणाला वाटतही नाही. शेवटी साहित्य व्यवहार काय किंवा कोणताही कलाव्यवहार, समाजाच्या प्रेरणा आणि गरजांवरच त्याचे भागधेय अवलंबून असते. तेव्हा आगामी काळात साहित्य व्यव्हाराचे स्वरुप कसे असेल, हे येत्या दहा-वीस वर्षातच स्पष्ट होईल.

**(* दिनांक ४ व ५ डिसेंबर १९९८ रोजी एल्फीन्स्टन महाविद्यालयात 'विसाव्या शतकातील मराठी साहित्य : एक ताळेबंद' या विषयावर झालेल्या चर्चासत्रात वाचला गेलेला निबंध.)**

***